गुप्त

शासकीय सेवेत नियुक्त करावयाच्या व्यक्तीचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य यांची तपासणी.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांकः व्हीसीए-१०८८/७/सीआर-३०/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ११ जुलै १९८८.

प रि प त्र क

शासन सेवेत नियुक्त करावयाच्या व्यक्तीचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य यांची तपासणी करण्यासाठी उमेदवारांनी भरून द्यावयाचा साक्षांकन नमुना, शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक व्हीसीए-१०६८/डी-१, दिनांक १० मे १९६८ सोबत जोडलेल्या प्रपत्रानुसार विहित केलेला आहे त्यात ओळख प्रमाणपत्र देणा-या अधिका-यांच्या यादीमध्ये विशेष कार्यकारी दंडाधिकारी यांचे नाव समाविष्ट करण्यात यावे, असा निर्णय शासनाने घेतला आहे. त्याचप्रमाणे साक्षांकन नमुन्यातील रकाना क्रमांक ११ बाबतची माहिती देताना संबंधित रकाना कोरा ठेवल्यास किंवा नुसती रेघ मारल्यास असा नमुना स्वीकारण्यात येऊ नये. संबंधित रकान्यात "होय" किंवा "नाही" असे लिहिल्यानंतरच नमुना स्वीकारण्यात यावा. सदर रकाना कोरा ठेवल्यास किंवा नुसती रेघ मारलेली असल्यास साक्षांकन नमुना उमेदवाराकडे परत पाठविण्यात येईल अशी सूचना साक्षांकन नमुन्यात क्रमांक ३ नंतर समाविष्ट करण्यात यावी असाही निर्णय घेण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. माळवे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,

[कृ.मा.प.]

शामनु-रोटा-साप्रवि-एच-४८३[३,०००-८-८८]

सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
शासनाचे सर्व सचिव,
x प्राथोनेट्री व सिनियर मास्टर, हायकोर्ट, मुंबई,
x निबंधक, हायकोर्ट, ॲपिलेट साईड, मुंबई,
x निबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे, नागपूर, नाशिक, औरंगाबाद,
ठाणे, अमरावती, पुणे,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग.

---

x पत्राने.